पिंपरी चिंचवड महानगरपालिका हद्दीतील अवैध बांधकामांना देय शास्ती माफ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : लवेसू-२०२२/प्र.क्र.५०६/नवि-२२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई: ४०००३२,
दिनांक :- ३ मार्च, २०२३

वाचा :- १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३०५/नवि-२०, दि.११.०१.२०१७

२) नगर विकास विभाग, पत्र क्र.पीसीसी-३०१९/प्र.क्र.१०६/नवि-२२, दि.०८.०३.२०१९ चे पत्र.

३) आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांचे क्र.कर/ मुख्य/ ९/ कावि/ ६५/ २०२३, दि.२२.०२.२०२३ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम २६७ अ मधील तरतूदीनुसार महानगरपालिका हद्दीतील बांधकामांना शास्ती आकारणेबाबत तरतूद आहे. त्यानुसार महानगरपालिकेकडून अवैध बांधकामांवर शास्तीची आकारणी करण्यात येते. तसेच संदर्भ क्र.२ च्या शासन पत्रान्वये पिंपरी चिंचवड महानगरपालिका क्षेत्राकरीता अनधिकृत बांधकामावर शास्ती दर आकारण्याबाबत सुधारणा करण्यात आलेली होती.

पिंपरी चिंचवड महानगरपालिकेत अवैध बांधकाम शास्ती रकमेचे प्रमाण मूळ करापेक्षा जास्त असल्याने शास्ती भरणा करणेबाबत मालमत्ता धारकांमध्ये उदासीनता आढळून येते आहे. भविष्यात शास्ती माफ होईल या अपेक्षेने मालमत्ताधारक शास्तीसह मूळ करचाही भरणा करीत नाहीत. त्यामुळे शास्ती माफ केल्यास मूळ कराचा भरणा होईल व स्थायी उत्पन्नात वाढ होईल, या हेतूने पिंपरी चिंचवड महानगरपालिका हद्दीतील अवैध बांधकामांना देय असलेली शास्ती माफ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पिंपरी चिंचवड महानगरपालिका हद्दीतील सर्व अवैध बांधकामावरील शास्ती खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून माफ करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे :-

१) अवैध बांधकाम मालमत्ता धारकांनी प्रथम मूळ कराचा संपूर्ण भरणा करणे आवश्यक राहील. तद्नंतर शास्ती माफ करण्यात येईल.

२) सदरची शास्ती माफी ही शासन आदेश निर्गमित होण्याच्या दिनांकपर्यंतच्या अवैध बांधकामांना लागू राहील.

३) महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ मधील कलम २६७ (अ) नुसार आकारलेली अवैध बांधकाम शास्ती माफ झाली म्हणजे सदरचे बांधकाम नियमित झाले असे समजण्यात येणार नाही.

४) शास्ती माफ करण्यात आल्याने त्यापोटी महानगरपालिकेस राज्य शासनाकडून कोणतेही आर्थिक सहाय्य अथवा नुकसान भरपाईची मागणी करता येणार नाही.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०३०३१६४०२४१७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by C Priyanka
Date: 2023.03.03 17:31:34 +05'30'

**(प्रियांका कुलकर्णी-छापवाले)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मुख्य सचिव, महराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी.
८. उप सचिव, (नवि-२२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवड नस्ती (नवि-२२).